**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : दुरूस्ती-०५१७/प्र.क्र.२९४/पोल-७.**
मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ जुलै, २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, पुणे शहर यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस लाईन, सोमवार पेठ आणि पोलीस लाईन, भवानी पेठ, येथील दुरूस्तीची कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरूस्ती-कार्यक्रम-आढावा/ ३७१/ ०९, दिनांक २०.०४.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस आयुक्त, पुणे शहर यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस लाईन, सोमवार पेठ आणि पोलीस लाईन, भवानी पेठ, येथील दुरूस्तीची पुढील कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे :-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | “Laying drainage line and concreting behind Builiding No. 5,7,8 at Somwarpeth Police Line, Pune.” | रु.२१,५५,६६८/- |
| २. | “Laying drainage line, concreting and behind Builiding No.2 at 60 Quarters and Gymnasium at Bhavanipeth Police Line, Pune.” | रु.२६,१०,२५१/- |
| एकूण | | रू.४७,६५,९१८/- |

२. उक्त कामासाठी, शाखा अभियंता, शहर (सार्वजनिक बांधकाम) शाखा क्र.१, पुणे, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.४७,६५,९१८/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे आणि पोलीस उप आयुक्त, मुख्यालय-१, पुणे शहर, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | “Laying drainage line and concreting behind Builiding No. 5,7,8 at Somwarpeth Police Line, Pune.” | रु.२२,३४,९४६/- |
| २. | “Laying drainage line, concreting and behind Builiding No.2 at 60 Quarters and Gymnasium at Bhavanipeth Police Line, Pune.” | रु.२७,०६,२७३/- |
| **एकूण** | | **रू.४९,४१,२१९/-** |

**४.** त्या अनुसार, पोलीस आयुक्त, पुणे शहर यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस लाईन, सोमवार पेठ आणि पोलीस लाईन, भवानी पेठ, येथील दुरूस्तीची, परिच्छेद ३ मधील तक्यात विनिर्दिष्ट केलेली, कामे करण्यासाठी **रू.४९,४१,२१९/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग, मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशी़र्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८४/इमा-२, दिनांक २०.०५.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०७१९१६२१४९५८२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.19 16:18:02 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे.

४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, पुणे.

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

८) निवड फाईल (पोल-७).